**श्रीमती कुरणे अंजूम चॉद, कनिष्ठ भूवैज्ञानिक यांचा दि.१५/०९/२०१४ ते दि.१८/१०/२०१४ पर्यंतचा सक्तीचा प्रतिक्षाधिन कालावधी हा कर्तव्यकाळ म्हणून गणण्यास मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आपना-२०१५/ प्र.क्र.२२६/पापु१५**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४००००१
तारीख: २७ मार्च, २०१७

वाचा

१) **शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांकः** सेनिवे-१००१/१३०/सेवा-४ दिनांक २.०६.२००३
२) **शासन आदेश, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः** आपना २०१४/ प्र.क्र.८९/ पापु १५ दि.३१.०७.२०१४
३) **शासन आदेश, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः** आपना४५१२/ प्र.क्र.२१०/ पापु १५ दि.१२.०९.२०१४
४) **मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. नांदेड यांचे पत्र.क्र. जा.क्र.जिपना/ ग्रापापुवि/आ-१/५३८/२०१५ दि.०२.०३.२०१५**
५) **मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. नांदेड यांचे पत्र.क्र.** जा.क्र.जिपना/पापुवि/आस्था-१/३७६४ दि.१७.११.२०१५

प्रस्तावना :-

श्रीमती कुरणे अंजुम चॅांद यांची कनिष्ठ भूवैज्ञानिक या पदी महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत नामनिर्देशनाने ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नांदेड येथे संदर्भ क्रमांक ३ येथील शासन आदेशान्वये नियुक्ती करण्यात आली आहे. त्यानुसार श्रीमती कुरणे या दि.१५/०९/२०१४ रोजी ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नांदेड येथे रुजु होण्याकरीता उपस्थित झालेल्या होत्या. तथापि त्यांच्या पदस्थापनेच्या पदावरील श्री. बी. एन. संगनवार यांना दि.१५/०९/२०१४ पर्यंत कार्यमुक्त करण्यात आले नसल्यामुळे, श्रीमती कुरणे अंजुम चॅांद यांना रुजु करुन घेण्याबाबत प्रश्न उपस्थित झालेला होता. महाराष्ट्र राज्यात दि. १२/०९/२०१४ ते दि.१८/१०/२०१४ या कालावधीत महाराष्ट्र विधानसभा निवडणूक २०१४ ची आदर्श आचारसंहीता लागू असल्यामुळे श्रीमती कुरणे अंजूम चॅांद यांचे

दि.१५/०९/२०१४ ते दि.१८/१०/२०१४ या कालावधीतील वेतन व भत्ते याबाबत शासनाकडून निर्णय प्राप्त झाल्यानंतर काढण्यात येतील या अटीवर त्यांना दि.१५/०९/२०१४ रोजी कनिष्ठ भूवैज्ञानिक या पदी जिल्हा परिषद, नांदेड येथे रुजु करुन घेण्यात आले. श्रीमती कुरणे अंजूम चॅांद यांना दि.१५/०९/२०१४ रोजी रुजु करुन घेण्यास तसेच दि.१५/०९/२०१४ ते दि.१८/१०/२०१४ या कालावधीतील वेतन अदा करण्याबाबत मार्गदर्शन करण्याची विनंती मूख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड यांनी संदर्भ क्रमांक ४ येथील पत्रान्वये केलेली आहे. यास्तव श्रीमती कुरणे अंजूम चॅांद यांचा उपरोक्त सक्तीचा प्रतीक्षाधीन कालावधी कर्तव्य कालावधी म्हणून नियमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संदर्भ क्रमांक २ येथील शासन आदेशान्वये श्री. बी. एन. संगनवार यांची जिल्हा परिषद, नांदेड येथून जिल्हा परिषद, परभणी येथे प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात आलेली होती. सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून बदली केलेल्या अधिकाऱ्यांच्या बदली आदेशांची सर्व संबंधितांनी तात्काळ अंमलबजावणी करावी अशा सूचनाही बदली आदेशात देण्यात आल्या होत्या. श्रीमती कुरणे अंजुम चॅांद, कनिष्ठ भूवैज्ञानिक यांची संदर्भ क्रमांक २ येथील आदेशान्वये नामनिर्देशनाने कनिष्ठ भूवैज्ञानिक या पदी नियुक्ती करुन त्यांना श्री.बी.एन.संगनवार यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नांदेड याठिकाणी पदस्थापना देण्यात आली होती. तथापि श्री.बी.एन.संगनवार यांना तात्काळ कार्यमुक्त न केल्याने तसेच दि.१२/०९/२०१४ ते दि.१८/१०/२०१४ या कालावधीत राज्यात आदर्श आचारसंहीता लागू असल्यामुळे श्रीमती कुरणे अंजूम चॅांद, कनिष्ठ भूवैज्ञानिक यांना दि.१५/०९/२०१४ ते दि.१८/१०/२०१४ या कालावधीत नियुक्तीसाठी प्रतिक्षाधीन रहावे लागले. श्रीमती कुरणे अंजूम चॅांद यांना पदस्थापना देण्यासाठी झालेला विलंब हा प्रशासकीय कारणास्तव झालेला असून झालेल्या विलंबास श्रीमती कुरणे अंजूम चॅांद या स्वत: जबाबदार नाहीत. त्यामुळे दि.१५/०९/२०१४ ते दि.१८/१०/२०१४ हा कालावधीत महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम १९८१ च्या प्रकरण २ मधील नियम ९ (एफ) (तीन) च्या तरतुदीनुसार कर्तव्य कालावधी म्हणून नियमित करण्यात येत आहे.

याप्रकरणी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नांदेड यांना कळविण्यात येते की, श्रीमती कुरणे अंजूम चॅांद यांचे दि.१५/०९/२०१४ ते दि.१८/१०/२०१४ या सक्तीच्या प्रतिक्षाधीन कालावधी दरम्यान प्रदान करावयाचे वेतन हे श्री.बी.एन.संगनवार, कनिष्ठ भूवैज्ञानिक यांना विहीत वेळेत कार्यमुक्त न करण्यास जबाबदार अधिकारी/कर्मचाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करण्याच्या अटीच्या अधीन राहून प्रदान करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय हा संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२३१३२१३९६२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2017.03.27 15:39:40 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड
३. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, औरंगाबाद
४. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड
५. महालेखाकार, महाराष्ट्र -१, मुंबई
६. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नांदेड.
७. श्रीमती कुरणे अंजुम चॅांद, कनिष्ठ भूवैज्ञानिक, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नांदेड
८. निवडनस्ती (पापु-१५)